**आरोग्य सेवा संचालनालयातर्गंत कुटुंब कल्याण कार्यक्रमाच्या फेररचनेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पदस्था १३१५/प्र.क्र.५०/सेवा - २**
गो. ते. रुग्णालय इमारत संकुल, दहावा मजला
मंत्रालय, मुंबई ०१
दिनांक : ३१ मार्च,२०१५

वाचा -

१) **सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्रमांकः पदस्था - २००७/ प्र.क्र.१७२(१)/सेवा २, दि.२३.५.२००७**

प्रस्तावना -

समाजातील सर्व घटकांसाठी विविध आरोग्य सुविधा उपलब्ध करुन देण्याच्या दृष्टीने तसेच अनेकविध आरोग्य कार्यक्रमांचे संनियंत्रण करण्यासाठी राज्य स्तरावर आरोग्य संचालनालय स्थापन करण्यात आले आहे. संचालनालयातील विविध कक्षांचे कामकाज तसेच संचालनालयामार्फत राबविण्यात येणाऱ्या योजनांची अंमलबजावणी परिणामकारकरित्या होणे आवश्यक आहे. राष्ट्रीय आरोग्य अभियान हा अत्यंत महत्वाकांक्षी राष्ट्रीय कार्यक्रम जनतेच्या सर्वांगीण आरोग्य विकासासाठी राबविण्यात येत आहे. या अभियानांतर्गत प्रजनन बाल आरोग्य, हिवताप निर्मुलन, अंधत्व नियंत्रण इ. महत्वाचे कार्यक्रम एकाच छत्राखाली राबविण्यात येत आहेत. कुटुंब कल्याण अंतर्गत राबविल्या जाणाऱ्या कार्यक्रमांचा या अभियानांतर्गत मोठा वाटा आहे. सदर कार्यक्रमास प्राप्त होणाऱ्या निधीच्या प्रमाणात प्रजनन बाल आरोग्य कार्यक्रम राबविण्यासाठी पुरेसे मनुष्य बळ उपलब्ध नाही. सदर कार्यक्रमाच्या तालुका पातळीपर्यंत देखरेख व परिवेक्षणासाठी सदर कार्यक्रमाचे नियंत्रण आयुक्त (कु.क.) व संचालक यांच्याकडे असणे आवश्यक आहे. ज्या योगे बालमृत्यू व मातामृत्यू दर कमी करण्याचे उद्दिष्ट साध्य करणे शक्य होईल तसेच नियमित लसीकरण कार्यक्रम प्रभावीपणे राबविता येईल. यासाठी सध्या अस्तित्वात असलेल्या आरोग्य संचालनालयाची फेररचना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, याबाबत सर्वंकष विचार करुन शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय-**

१. आरोग्य सेवा संचालनालयाची फेररचना करण्याबाबतचा विभागाचा संदर्भाधीन शासन निर्णय क्र. पदस्था - २००७/ प्र.क्र.१७२(१)/सेवा २, दि.२३.५.२००७ रद्द करण्यात येत आहे.

२. कुटुंब कल्याण संबंधी सर्व कामकाज संचालक, आरोग्य सेवा यांच्याऐवजी आयुक्त (कु.क.) व संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान यांच्याकडे सोपविण्यात येत आहे. त्यासाठी अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा (सामाजिक बांधिलकी असलेले कार्यक्रम) (कु.क.),पुणे यांनी शासनास

सादर करावयाचे कुटुंब कल्याण कार्यक्रमासंबंधीचे प्रस्ताव आयुक्त (कु.क.) व संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान यांच्यामार्फतच सादर करावेत.

३. वरील फेरबदलांमुळे कुटुंब कल्याण कार्यक्रम राबविण्यासाठीची आस्थापनाविषयक संरचना सदर शासन निर्णयाच्या परिशिष्ट- अ मध्ये दर्शविल्याप्रमाणे राहील.

४. या शासन निर्णयान्वये प्रस्थापित होणारी फेररचना शासन निर्णयाच्या दिनांकापासून अंमलात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक क्र.२०१५०३३०१८५७१४१०१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Saunik Sujata M

Digitally signed by Saunik Sujata M
DN: CN = Saunik Sujata M, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Dept
Date: 2015.03.31 11:00:14 +05'30'

(सुजाता सौनिक)
प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई (पत्राद्वारे)
२) मुख्य सचिव,महाराष्ट्र राज्य,मंत्रालय,मुंबई
३) मा.मुख्यमंत्री यांचे सचिव
४) अतिरिक्त मुख्य सचिव सर्व विभाग, मंत्रालय,मुंबई
५) प्रधान सचिव / सचिव, सर्व विभाग, मंत्रालय,मुंबई
६) आयुक्त (कु.क.) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान,मुंबई
७) आयुक्त, राज्य कामगार विमा योजना,मुंबई
८) मुख्य कार्यकारी अधिकारी, राजीव गांधी जीवनदायी योजना,मुंबई
९) विभागीय आयुक्त (सर्व)
१०) संचालक, आरोग्य सेवा,मुंबई
११) जिल्हाधिकारी (सर्व)
१२) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१३) प्रकल्प संचालक, महाराष्ट्र राज्य एडस् नियंत्रण सोसायटी,मुंबई

१४) अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा (सर्व)
१५) सहसंचालक, आरोग्य सेवा (सर्व)
१६) उपसंचालक, आरोग्य सेवा (सर्व)
१७) जिल्हा शल्य चिकित्सक, सामान्य रुग्णालय (सर्व)
१८) जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१९) महालेखापाल ,(क्षालेखा परी)महाराष्ट्र १-मुंबई २-महाराष्ट्र /नागपूर
२०) महालेखापाल ,(लेखा व अनुज्ञेयता)महाराष्ट्र १-मुंबई २-महाराष्ट्र /नागपूर
२१) अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई
२२) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
२३) स्वीय सहायक, मा.मंत्री (आरोग्य) / मा.राज्यमंत्री (आरोग्य) मंत्रालय,मुंबई
२४) स्वीय सहायक, प्रधान सचिव (आरोग्य)
२५) सर्व अधिकारी, सार्वजनिक आरोग्य विभाग,मंत्रालय,मुंबई
२६) निवड नस्ती

**परिशिष्ठ अ**

**शासन निर्णय क्र. पदस्था १३१५/प्र.क्र.५०/सेवा -२, दिनांक : ३१ मार्च,२०१५**

कुटुंब कल्याण कार्यक्रम राबविण्यासाठी आस्थापना विषयक संरचना पुढीलप्रमाणे राहील-

आयुक्त (कु.क.) व संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान



अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा (सामाजिक बांधिलकी असलेले कार्यक्रम)/(कु.क.),पुणे



सहसंचालक, आरोग्य सेवा (कु.क.),पुणे



उपसंचालक, आरोग्य सेवा (कु.क.),पुणे



सहायक संचालक, आरोग्य सेवा (कु.क.),पुणे (५ पदे)

Saunik Sujata M

Digitally signed by Saunik Sujata M
DN: CN = Saunik Sujata M, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Dept
Date: 2015.03.31 11:15:09 +05'30'

( सुजाता सौनिक )
प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन